**महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लि. या विशेष हेतू वाहन कंपनीच्या संचालक मंडळाची पुर्नरचना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांक - विकंलि २०२१/प्र.क्र.२५( भाग-२)/२०२१/जसंनि**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १३/०३/२०२५

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१३/का. १४३३ नियोजन विभाग, दि. ०८/०७/२०१९.
२) शासन निर्णय क्र. विकंलि-२०२१/प्र.क्र.२५/२०२१/जसंनि, दि.१९/०४/२०२१

**प्रस्तावना -**

महाराष्ट्रातील पाटबंधारे प्रकल्पांची कामे विविध पाटबंधारे विकास महामंडळामार्फत कर्जरोखे उभारुन करण्यात येत होती. सर्व महामंडळासाठी एकत्रित कर्जरोखे उभारण्यासाठी नियोजन विभागाने त्यांचे दि. २७ सप्टेंबर २००२ च्या शासन निर्णयान्वये " महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी मर्यादित" या विशेष हेतू वाहन कंपनीची स्थापना ऑक्टोबर २००२ मध्ये करण्यात आली. सदर महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनीचे कामकाज सिकॉम लि. यांना देण्यात आले. त्यामुळे महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनीसाठी स्वतंत्र कार्यालय/आस्थापना कार्यरत नाही. या कामासाठी नियोजन विभाग हा प्रशासकीय विभाग होता.

नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.१, दि. ०८ जूलै, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेडचे कामकाज नियोजन विभागाकडून जलसंपदा विभागाकडे वर्ग करण्यात आले. त्यानुसार महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लि. या विशेष हेतू वाहन कंपनीच्या संचालक मंडळाची पुर्नरचना जलसंपदा विभागाच्या संदर्भ क्र.२, दि.१९/०४/२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार करण्यात आलेली आहे.

सदर विषय पाटबंधारे महामंडळांसाठी उभारलेले कर्जरोखे, त्यावरील मुद्दल व व्याजाशी संबंधित आहे. या सर्व वित्तीय बाबी आहेत यासंबंधी उद्भवणाऱ्या अनेक बाबी जसे की कंपनीशी संबंधित वित्तीय लेखे, बहूपक्षीय करार व त्यातील तरतूदी, आयकर विभागाकडून प्राप्त होणाऱ्या सूचना, RBI, SEBI यांच्याकडून प्राप्त होणाऱ्या सूचना व त्याच्या पूर्तते अभावी भविष्यात उद्भवू शकणाऱ्या अडचणी आर्थिक विषयाशी संबंधित असून तांत्रिक आस्थापनेमार्फत हाताळणे उचित होणार नाही. जलसंपत्ती दल हे पूर्णपणे तांत्रिक विषय हाताळत असून या दलामध्ये संबंधित विषयासाठी आस्थापना उपलब्ध नाही. त्यानुषंगाने प्रशासकीय सोय म्हणून उपरोक्त कामकाज जबाबदारी अर्थ दलाने हाताळावी, असा निर्णय झालेला आहे.

सदर विषय अर्थ कार्यासनास हस्तांतरीत करण्यात आला असल्याने महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेड या कंपनीच्या संचालक मंडळामध्ये आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव ( जलसंपदा विभाग ) यांचा समावेश करणे आवश्यक आहे. त्यानुसार महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लि. या विशेष हेतू वाहन कंपनीच्या संचालक मंडळाची पुर्नरचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लि. या विशेष हेतू वाहन कंपनीच्या संचालक मंडळाची पुर्नरचना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे:-

| **अ.क्र.** | **महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेड - संचालक मंडळातील सदस्य** | **पदभार** |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | संचालक |
| ३. | सचिव, लाक्षेवि, जलसंपदा विभाग | संचालक |
| ४. | सचिव, प्रकल्प समन्वय, जलसंपदा विभाग | संचालक |
| ५. | मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव, जलसंपदा विभाग | संचालक |
| ६. | आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग | संचालक |
| ७. | उप सचिव ( जसं ), जलसंपदा विभाग | संचालक |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३१३१५१९२८७७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR

Digitally signed by SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=c8ca43b8af581a3826084d1463fa7e004e47a9457ec0be246ec1b6e31297909a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2E11F2710D714EA0D63E58112977EFBE2A7E923B4738CFD1CF4206BF361E0575, cn=SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR
Date: 2025.03.13 15:20:21 +05'30'

**( सविता बोधेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३)मा मंत्री, जलसंपदा (गोदावरी, कृष्णा खोरे विकास महामंडळ ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

४) मा मंत्री, जलसंपदा (विदर्भ,तापी व कोकण विकास महामंडळ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) सचिव ( लाक्षेवि ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) सचिव ( प्रकल्प समन्वय ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक मे. सिकॉम लि. सॉलिटेअर कार्पोरेट पार्क, बिल्डींग-४, अंधेरी घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी (पूर्व), मुंबई-४०००९३.
१५) प्रबंधक, महाराष्ट्र पाटबंधारे वित्तीय कंपनी लिमिटेड, व्दारा मे. सिकॉम लि. सॉलिटेअर कार्पोरेट बिल्डींग-४, अंधेरी-घाटकोपर लिंक रोड, चकाला, अंधेरी (पूर्व), मुंबई-४०००९३.
१६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१७) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१८) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१९) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
२०) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
२१) आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) सह सचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) मुख्य अभियंता ( जसं) व सह सचिव , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४) अपर संचालक (इ.आ.स.) अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन ४ था मजला, मुंबई.
२५) सह सचिव, वित्त विभाग (व्यय -१२), मंत्रालय, मुंबई
२६) उपसचिव, ऋण व हमी संनियत्रण कक्ष, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२७) जलसंपदा विभाग, अर्थ-२ कार्यासन.
२८) जसंनि संग्रहार्थ.